**अतिरिक्तसंचालक, आरोग्य सेवा(कुटुंब कल्याण), पुणे यांचे वापरातील कार्यालयीन वाहन क्र.MH १२ CY ९८ टोयोटा इनोव्हा या वाहनाच्या दुरुस्ती खर्चास प्रशासकिय मान्यता**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वाहन-२०१७/ प्र.क्र.१६/ आरोग्य-४**
मंत्रालय, १० वा मजला, संकूल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
तारीख: २३ जून, २०१७.

वाचा

१) **आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/ कक्ष-१५/टे-१/MH१२CY९८-वा.दु.प्रशासकिय मान्यता/न.क्र.८३९-४०/२०१७, दि.२५.०४.२०१७.**

**प्रस्तावना**

संदर्भाधीन पत्रान्वये अतिरिक्तसंचालक, आरोग्य सेवा (कुटुंब कल्याण), पुणे यांचे वापरातील कार्यालयीन वाहन क्र.MH १२ CY ९८ इनोव्हा या वाहनाच्या दुरूस्ती खर्चासाठी अंदाजे रु.१.७५ लक्ष इतक्या खर्चाचाप्रस्ताव शासनास सादर केला आहे. तसेच सदर वाहनावर सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात अद्याप पर्यंत रु.५६,०३४/- इतका खर्च झाल्याचे निदर्शनास येत आहे. सदर वाहन दुरूस्तीकरीता एकूण रू.२,३१,०३४/- ( अक्षरी रूपये दोन लक्ष एकतीस हजार चौतीस फक्त) इतक्या होणाऱ्या खर्चाचा प्रस्ताव शासनास प्राप्त झाला आहे. तसेच सदर वाहनाच्या दुरूस्तीवर होणारा व झालेला खर्चास आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी प्रमाणित केलेले आहे. या अनुषंगाने सदर वाहनावरील दुरूस्ती खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

या शासन निर्णयान्वये अतिरिक्तसंचालक, आरोग्य सेवा (कुटुंब कल्याण), पुणे यांचे वापरातील कार्यालयीन वाहन क्र.MH १२ CY ९८ इनोव्हा या वाहनाच्या दुरूस्तीवर सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात होणाऱ्या व झालेल्या एकूण रू.२,३१,०३४/- ( अक्षरी रूपये दोन लक्ष एकतीस हजार चौतीस फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय मंजुरी देण्यात येत आहे. सदर वाहन दुरुस्तीसाठी आवश्यक खर्च उपसंचालक, आरोग्य सेवा (परिवहन), पुणे यांच्या अधिनस्त २२११ ०६१२ या लेखाशिर्षातर्गत उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक आर - १
२२११ - कुटुंब कल्याण कार्यक्रम
१०४ - परिवहन

०१ - परिवहन सेवा
(०१)(०२) - प्राथमिक आरोग्य केंद्र व ग्रामीण कुटुंब कल्याण केंद्रे यांना देण्यात आलेल्या वाहनांना पेट्रोल, तेल व वंगण पुरविणे व त्यांचे परिरक्षण करणे.
(२२११ ०६१२) ५१ - मोटारवाहने

वित्तीय अधिकार नियम पुस्तीका १९७८ मधील संबंधीत नियमानुसार व त्याखालील अटीचे पालन करण्याच्या अधिनतेने मंजूरी देण्यात येत आहे. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील भाग-पहिला, उपविभाग-२ मधील अनुक्रमांक १९ येथील नियम क्रमांक ६९ अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६२२१७३९००८३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2017.06.23 11:10:13 +05'30'

**रोशनी कदम-पाटील**
अवर सचिव महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
२. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ),आरोग्य सेवा, पुणे.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), पुणे.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा ( परिवहन ), पुणे.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई.
७. महालेखापाल १ / २, महाराष्ट्र ( लेखा व लेखापरिक्षा ) / लेखा व अनुज्ञेयता, मुंबई/ नागपूर.
८. विनियम कार्यासन, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. कार्यासन अधिकारी ( अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१०. निवडनस्ती ( आरोग्य-४ ).